| | |
|---|---|
| वितरण आदेश क्र. ३ | मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, |
| सन २०१४-१५ | नाथनगर (उत्तर), पैठण, जिल्हा -औरंगाबाद |
| | सहाय्यक अनुदान २०१४-२०१५ (योजनेतर) |
| | (वेतनेतर ) (दुसरा हप्ता ) |

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१४/प्र.क्र.१०९/१४/१२ -अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक- ९ फेब्रुवारी, २०१५

वाचा- १ .सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक, क्रमांक बीयुडी १०१४/प्रक्र.९१ /२०१४/२५, दि.९ एप्रिल २०१४

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि.१५.५.२०१४

३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/प्र. क्र.११०/अर्थसंकल्प ३,दि.१ जुलै २०१४.

४. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्रक्र. ९१ /२०१४/२५, दि. ३ जुलै, २०१४.

५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि.२५.११.२०१४

**शासन निर्णय:-**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **वेतनेतर रु.२०.०० लाख** व **वेतने रु.३२.८५ लाख** अशी **एकूण रु. ५२.८५ लाख ( रुपये बावन्न लाख, पंच्याऐंशी हजार फक्त)** इतकी तरतूद करण्यात आली असून संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये सदर **लेखा अनुदान** नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले होते. आता संदर्भाधीन क्रमांक ४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला विकास प्रशिक्षण व तदनुषंगिक खर्च तसेच, अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल ते जुलै,२०१४ या चार महिन्यांकरिता वेतनेतर रु. ६,६६,६८०/- व वेतने रु.१०,९५,०००/-असे एकूण रु. १७,६१,६८०/-

(रुपये सतरा लाख, एकसष्ट हजार, सहाशे ऐंशी फक्त) इतके योजनेतर सहाय्यक अनुदान ( पहिला हप्ता ) संदर्भाधीन क्रमांक. २ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले होते. तसेच, संस्थेस अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन परिपत्रकान्वये ६० % च्या मर्यादेत, ऑगस्ट ते नोव्हेंबर २०१४ या चार महिन्यांच्या खर्चासाठी वेतने रु.८,७६,०००/- ( रुपये आठ लाख, शहात्तर हजार फक्त ) इतके योजनेतर सहाय्यक अनुदान ( दुसरा हप्ता ) संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आले आहे. आता संस्थेस विकास प्रशिक्षण व तद्रुषंगिक खर्च यासाठी, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानापैकी **ऑगस्ट ते नोव्हेंबर २०१४ या चार महिन्यांच्या खर्चासाठी वेतनेतरकरिता रु.५,३३,३२०/- ( पाच लाख, तेहतीस हजार , तीनशे वीस ,फक्त ) इतके योजनेतर सहाय्यक अनुदान मंजूर करण्यात येत आहे.**

३. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष **"२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (योजनेतर) ( २०७० ०७४६ )** याखाली **सन २०१४-२०१५** या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून **"३१ सहाय्यक अनुदाने वेतनेतर** याप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान तात्काळ कोषागारातून आहरित करुन सदर अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१४-२०१५ मधील खर्च मंजूर अनुदानाइतका सिमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला सदर विनियोग प्रमाणपत्रात बाबनिहाय तपशीलवार खर्चाची नोंद घेऊन तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या, अनौ.संदर्भ क्र.६६/२०१५/कार्यासन- व्यय -४ दि.२१.१.२०१५ च्या व सह सचिव, अर्थसंकल्प -१४, यांच्या दि. २२.१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०९१११८२९७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 916982, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=da026e85ae8cbb4e3c2acdbecbbf2f6d6cb0ae6ed5c1e54483490119ee0456ad, cn=PATIL PRATIBHA MADHAV
Date: 2015.02.09 16:18:04 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,

३) अ.मु. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

५) विशेष कार्य अधिकारी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद

६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद

७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद

८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.

९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई

१०) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई

११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)